"राज्यांना भांडवली गुंतवणुकीसाठी विशेष सहाय्य २०२३-२४" या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत युनिटी मॉलचे बांधकाम करणे यासाठी नवीन लेखाशिर्ष उघडणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सिआयडी-३३२३/६०७/प्र.क्र.८९ (भाग-१)/नवि-१०**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २६ जुन २०२३

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाकडून " राज्यांना भांडवली गुंतवणुकीसाठी विशेष सहाय्य २०२३-२४ " या योजनेंतर्गत राज्य सरकारांना भांडवली गुंतवणूक प्रकल्पांसाठी ५० वर्षांच्या बिनव्याजी कर्जाच्या स्वरूपात आर्थिक सहाय्य प्रदान करण्यात येत आहे. या योजनेसंदर्भात केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयाने दिनांक ०३.०२.२०२३ व दि.०२.०५.२०२३ रोजीच्या पत्रान्वये मार्गदर्शक तत्वे निर्गमित केली आहेत. योजनेंतर्गत राज्यांना प्रदान करण्यात येणारा निधी राज्याच्या दीर्घकालीन फायद्यासाठी नवीन आणि चालू असलेल्या भांडवली प्रकल्पांसाठी वापरायचा आहे. राज्य शासनाने सादर केलेल्या प्रकल्प प्रस्तावांची केंद्र शासनाकडून छानणी करण्यात येणार असून त्याअंती मंजुर प्रकल्पांना निधी प्राप्त होणार आहे. या योजनेंतर्गत सन २०२३-२४ या वर्षात " युनिटी मॉलचे बांधकाम करणे " या योजनेसाठी प्राप्त होणारा निधी अर्थसंकल्पीत करुन तो कार्यान्वयीन यंत्रणांना वितरित करण्यासाठी नवीन लेखाशिर्ष उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाच्या " राज्यांना भांडवली गुंतवणुकीसाठी विशेष सहाय्य २०२३-२४ " या योजनेंतर्गत " युनिटी मॉलचे बांधकाम करणे " या योजनेसाठी नगर विकास विभागास प्राप्त होणारा निधी अर्थसंकल्पीत करुन कार्यान्वयीन यंत्रणांना वितरित करणेसाठी खालीलप्रमाणे नवीन लेखाशिर्ष उघडण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| मागणी क्रमांक- एफ़-७<br>६२१७, नगर विकासासाठी कर्जे<br>०१, राज्य भांडवली विकास<br>१९०,सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांसाठी कर्जे<br>(०१) केंद्र शासनाकडून राज्यांना भांडवली गुंतवणूकीसाठी विशेष सहाय्य योजनेंतर्गत बिनव्याजी कर्ज (केंद्र हिस्सा १००%) | Demand No. F-7<br>6217, Loans for Urban Development<br>01, State Capital Development<br>190, Loans to Public Sector and Other Undertakings<br>(01) Interest free loan from the Central Government to the States under special |

| | |
|---|---|
| (०१)(०५)केंद्र शासनाच्या राज्यांना भांडवली गुंतवणूकीसाठी विशेष सहाय्य योजना २०२३-२४ अंतर्गत युनिटी मॉलचे बांधकाम करणे.<br>(योजना भाग-६) (कार्यक्रम) (६२१७१०१३) | assistance scheme for capital investment (Central Share 100%)<br>(01) (05) Construction of Unity Malls Under Special Assistance to State for Capital Investment (Scheme Part-VI) (Scheme) (62171013) |

**०२.** केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधी वाटपासंदर्भात केंद्र शासनाच्या दि.२३.०३.२०२१ च्या पत्रान्वये विहीत केलेल्या तसेच राज्य शासनाच्या वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र.३५/कोषा प्रशा-४, दि. १.७.२०२१ अन्वये तसेच केंद्र शासनाच्या दि.०३.०२.२०२३. व दि.०२.०५०.२०२३ च्या मार्गदर्शक सुचना मसेच या योजनेबाबत वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशांचे तंतोतंत पालन करावे.

**०३.** केंद्र शासनाच्या " राज्यांना भांडवली गुंतवणुकीसाठी विशेष सहाय्य २०२३-२४" या योजनेंअंतर्गत युनिटी मॉलचे बांधकाम करणे या योजनेच्या अंमलबजावणी व समन्वयासाठी उप सचिव / सह सचिव ( नवि-१०) यांची "**नोडल अधिकारी**" म्हणुन नियुक्ती करण्यात येत आहे.

**०४.** सदर लेखाशिर्षांतर्गत प्राप्त होणारा निधी आहरीत करण्यासाठी कक्ष अधिकारी, नवि-५ नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना " आहरण व संवितरण अधिकारी " म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**०५.** सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.१९८/व्यय-३ दि.०९.०५.२०२३,संदर्भ क्र.२२/२०२३ ऋण व हमी, दि. १२.०५.२०२३ व प्रधान महालेखाकार कार्यालय, मुंबई यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२३/२०२३-२४/३०२६ दि.१५.०६.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

**०६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६२६१२३४४७८३२५ असा आहे. सदरहू शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHINDE SUBRAO NARAYAN

Digitally signed by SHINDE SUBRAO NARAYAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GOVERNMENT OF MAHARASHTRA, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E5BB5862D0E131A274D92F7A1ACEF953E01301C1B0FB615DC6CCE4812BDED257, cn=SHINDE SUBRAO NARAYAN
Date: 2023.06.27 16:06:23 +05'30'

**(सुबराव शिंदे)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य,यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई.

३. मा.उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई.
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव ( नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
९. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, सिडको
१०. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, मुंबई / नागपुर
११. महालेखापाल, (लेखापरिक्षा)-१/२, मुंबई/ नागपुर
१२. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४. अवर सचिव ( नवि-१३), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. उप सचिव (नवि-७), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. निवड नस्ती (नवि-१०)